अनुदान वाटप- २०११-१२
जिल्हा परिषद आणि पंचायत समित्या
यांच्या पोटनिवडणूका

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक: जिपनि-२०११/प्र.क्र.५/पंरा-२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ४ जून, २०११.

वाचा:-१.राज्य निवडणूक आयोग यांचे पत्र .क्र.रानिआ/जिपपंसनि/२०११/प्र.क्र.४/का.७
दि.२०/०५/२०११.

**शासन निर्णय:-**

सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षासाठी "मागणी क्र. एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन ०९३ (०२) (०१) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणूकाबाबतचा खर्च (२०५३ ०५२९) (योजनेत्तर) (राज्यक्षेत्र) (दत्तमत)" या लेखाशिर्षाखाली सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या एकूण रु.६०,२१,००/- हजार (रुपये साठ कोटी एकविस लक्ष फक्त) इतक्या अर्थसंकल्पिय तरतुदीमधून सिंधुदुर्ग व धुळे या जिल्ह्यांच्या जिल्हा परिषदा व तेल्हारा (अकोला) व जळगांव-जामोद (बुलढाणा) या पंचायत समित्या मधील पोटनिवडणूकांचा खर्च भागविण्याकरीता राज्य निवडणूक आयोगाने दिनांक ३०.०१.२०१० च्या पत्रान्वये दिलेल्या निर्देशानुसार जिल्हापरिषदांच्या पोट निवडणूकासाठी प्रत्येकी रु.५ लक्ष व पंचायत समित्यांच्या पोटनिवडणुकांसाठी प्रत्येकी रु.३ लक्ष या प्रमाणे एकूण रु.१६,००,०००/- (रुपये सोळा लक्ष फक्त) इतकी तरतूद संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडे खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्या प्रमाणे सुपुर्द करण्यात येत आहे.

(अ) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान हे शासनाने वेळोवेळी निश्चित केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन आहे.

(ब) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान हे राज्य निवडणूक आयोगाने वरिल संदर्भ क्र.१ च्या पत्रान्वये दिनांक २६.०६.२०११ रोजी होणा-या जिल्हा परिषदा / पंचायत समिती पोट निवडणूक खर्चाकरिताच वापरण्यात यावे.

(क ) मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही व कोणतीही अनियमितता घडणार नाही. याची दक्षता जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.

(ड) ह्या अनुदानातून होणाऱ्या खर्चाची मासिक विवरणपत्रे (उपयोगिता प्रमाणपत्रे) जिल्हाधिकारी यांनी विभागीय आयुक्त व शासनाकडे प्रत्येक पुढील १५ तारखेपूर्वी सादर करावीत. खर्चावर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

(ई) सदर अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीनुसार जिल्हाधिकारी यांचा युजर आयडी क्रमांक ०००९३०/उप जिल्हा निवडणूक अधिकारी युजर आयडी क्रमांक ०००९३४/जिल्हाधिकारी यांचे प्रमुख लिपिक युजर आयडी क्रमांक ०००९४८ (Head Clerk to the Collecter) यांच्या युजर आयडीवर वितरीत करण्यात येत आहे.

उपरोक्त प्रयोजनार्थ होणारा खर्च हा "मागणी क्र. एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन ०९३ (०२) (०१) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणूकाबाबतचा खर्च (२०५३ ०५२९) (योजनेत्तर) (राज्यक्षेत्र) (दत्तमत)" या लेखाशिर्षाखालील सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(गजानन दा.लाभे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत :

१) विभागीय आयुक्त, (सर्व).
२) जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग धुळे अकोला व बुलढाणा
३) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई, नागपूर
४) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व परिक्षण) मुंबई, नागपूर
५) उपायुक्त, राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
६) जिल्हा लेखा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग धुळे अकोला व बुलढाणा
७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.(दोन प्रती)
८) कार्यासन क्रमांक वित्त-१, वित्त-७ व वित्त-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
९) वित्त विभाग, (अर्थसंकल्प- १७ व व्यय-१५), मंत्रालय, मुंबई.
१०) निवड नस्ती कार्यासन क्र. पंरा-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

# विवरणपत्र

शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.जिपनि-२०१०/प्र.क्र.५/पंरा-२, दि.४ जून, २०११ चे सहपत्र.

(रुपये हजारात)

| अ.क्र | जिल्हा | जिल्हा परिषद पोट निवडणूकांची संख्या | पंचायत समितीच्या पोट निवडणूकांची संख्या | या आदेशान्वये मंजूर करण्यात येत असलेले अनुदान (कार्यालयीन खर्च) |
|---|---|---|---|---|
| १ | सिंधुदुर्ग | १ | ० | ५०० |
| २ | धुळे | १ | ० | ५०० |
| ३ | अकोला | ० | १ | ३०० |
| ४ | बुलढाणा | ० | १ | ३०० |
| | एकूण | २ | २ | १६०० |

(रुपये सोळा लक्ष फक्त)

(गजानन दा.लाभे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.